**राज्यात स्वयंसेवी संस्थांमार्फत**
**बालविकासासाठी चालविण्यात येणाऱ्या**
**बालगृहे,बालकाश्रमांचे स्थलांतर**
**करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# महिला व बाल विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बालगृ-२०१४/प्र.क्र.६३/का-८

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: २१ जुलै, २०१४.

**प्रस्तावना :-**

राज्यात काळजी व संरक्षणाची गरज असलेली बालके,अनाथ,एक पालक बालके,आई वडील आहेत परंतु आर्थिक स्थितीमुळे सांभाळ करणे अशक्य आहे अशा बालकांकरिता बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २००० व २००६, अन्वये बालगृहे / बालकाश्रमे चालविली जातात. सदर बालगृहे / बालकाश्रमात बालकांना अन्न,वस्त्र व निवारा यासोबतच भौतिक सुविधा उपलब्ध करुन दिल्या जातात. सद्यस्थितीत राज्यात स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या बालगृहांची एकूण संख्या ९९४ इतकी आहे. शासन निर्णय दि.२२ डिसेंबर २०१२ अन्वये एकूण ४० निकषे बालगृहांच्या सुयोग्य व तंत्रशुध्द संचलनाकरिता विहीत करण्यात आली आहे. बरेचदा या निकषांची पूर्तता करताना संस्थांना तेथील स्थानिक व नैसर्गिक परिस्थितीमुळे अनेक अडचणींचा सामना करावा लागतो. शासनाच्या सद्याच्या धोरणानुसार स्वयंसेवी संस्थांना नवीन बालगृह सुरू करण्यास मान्यता न देण्याचे धोरण आहे. त्याचप्रमाणे बालन्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम व महाराष्ट्र बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियमामध्ये असलेल्या तरतुदीप्रमाणे तसेच शासनाने विहीत केलेल्या अटींची पूर्तता न करणाऱ्या एकूण १९१ बालगृहांची मान्यता शासनाने रद्द केलेली आहे. बरेचदा सदर स्वयंसेवी संस्थाकडून शासनाने ज्याठिकाणी बालगृह सुरू करण्यास मान्यता दिलेली असते त्याऐवजी दुसऱ्या ठिकाणी बालगृह स्थलांतर करण्याची मागणी केली जाते. या अनुषंगाने राज्यात स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या बालगृहे / बालकाश्रमाचे संस्थेच्या मागणीप्रमाणे स्थलांतर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याप्रमाणे शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय:-** बालन्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम,२००० व २००६ अन्वये निराधार, बेघर, अपंग, अनाथ बालकांकरिता बालगृहांची आवश्यकता असल्याने मा.मुख्यमंत्री महोदयांनी यापूर्वी “रद्द करण्यात येणाऱ्या संस्थांकडे बालसुधारगृहे एकही बालसुधारगृह नसलेल्या तालुक्यात वाटप करण्याचे धोरण मान्य. वाटप करताना ज्या जिल्हयामध्ये सर्वात कमी बालसुधारगृहे आहेत त्या जिल्हयातील तालुक्यात प्रथम या क्रमाने वाटप करण्याची कार्यपध्दती विभागाने निश्चित करावी.” असे आदेशित केले आहे. त्यानुसार ज्या तालुक्यात एकही बालगृह नाही अशा तालुक्यात शासनाने मान्यता दिलेल्या बालगृहाचे स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येईल.

१) स्थलांतरित करण्यात येणाऱ्या तालुक्यात एकही बालगृह नसावे.
२) स्थलांतरित करण्यात येणाऱ्या बालगृहांनी बालन्याय )मुलांची काळजी व संरक्षण (अधिनियम व महाराष्ट्र बाल न्याय) मुलांची काळजी व संरक्षण (नियम मधील तरतुदी व शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या निकषांची पूर्तता करणे आवश्यक राहील.
३) सदर संस्थेस शासनाने स्थलांतरास मान्यता दिल्यानंतर बालगृहाचे स्थलांतर करण्यापूर्वी शासनाच्या बालनिधीत संस्थेने रू.२५००० -/इतका निधी जमा करणे आवश्यक राहील.
४) संस्थेने बायोमेट्रिक उपस्थिती प्रणाली कार्यान्वित करणे बंधनकारक राहील.
५) संस्थेने ट्रॅक चाईल्ड सिस्टीम मध्ये मुलांची अद्ययावत माहिती नियमित भरणे आवश्यक राहील त्याशिवाय संस्थेला शासनाकडून अनुदान देय होणार नाही.
६) बालगृहाचे स्थलांतरास शासन मान्यता आवश्यक राहील .शासनाच्या परवानगीशिवाय कोणत्याही संस्थेला बालगृहाचे स्थलांतर करता येणार नाही.तथापि जर शासनाची परवानगी न घेता संस्थांनी बालगृहाचे स्थलांतर केल्यास बालगृहाची मान्यता आपोआप रद्द होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३११८१००१६४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2014.08.07 12:25:03 +05'30'

**उज्ज्वल उके**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव.
८) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
११) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण आयोग, वरळी, मुंबई

१२) सदस्य सचिव, राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई.
१३) सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बालविकास विभाग.
१४) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१५) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
१६) उपसचिव(श्री चव्हाण),उपसचिव(श्री हजारी),महिला व बालविकास विभाग,यांचे स्वीय सहायक.
१७) सर्व अवर सचिव, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती, का-८.